" महात्मा गांधी तंटामुक्त गाव मोहीम "
ग्रामपंचायतींना तंटामुक्त गाव समितीच्या बैठका आयोजित करणे आणि विविध प्रकारच्या नोंदवह्या व लेखन सामग्री खरेदी करण्यासाठी सन २००९-२०१० या वर्षाकरीता निधी उपलब्ध करुन देणेबाबत....

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक तंमुगा: १००९/प्र.क्र.८७/२००९/पोल-१५,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक :- २६ फेब्रुवारी, २०१०**

वाचा :- १) शासन निर्णय गृह विभाग क्रमांक- तंमुगा-१००८/सीआर-४३/२००८/पोल-१५, दि.१४/८/२००८.
२) शासन निर्णय गृह विभाग क्रमांक- तंमुगा-१००८/सीआर-३३/पोल-१५, दि.२/३/२००९.

**शासन निर्णय :-** दिनांक १५ ऑगस्ट, २००७ पासून राज्यात महात्मा गांधी तंटामुक्त गाव मोहिम सुरु करण्यात आली आहे. सदर मोहिम राज्यातील सर्व ग्रामपंचायतीमध्ये सातत्याने राबविण्यात येणार असून मोहिमेसाठी ग्रामपंचायत हा घटक विहित करण्यात आला आहे. ही मोहिम अधिक सक्षमपणे राबविण्यासाठी ग्रामपंचायतींना बैठकांचे आयोजन करणे, नोंदवह्या ठेवणे, तंटयांची माहिती संकलित करणे या बाबींसाठी काही प्रमाणात निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती. त्यानुसार संदर्भात क्रमांक (१) येथील आदेशान्वये राज्यातील ४,००० पर्यंत लोकसंख्या असलेल्या ग्रामपंचायतींना प्रतिवर्षी रु. १००० - या प्रमाणे आणि ४,००१ व त्यापेक्षा अधिक लोकसंख्या असलेल्या ग्रामपंचायतींना प्रतिवर्षी रु. २०००/- या प्रमाणे एकूण रु. ३,१२,२९,०००/- (रु. तीन कोटी बारा लाख एकोणतीस हजार फक्त) इतका निधी सन २००८-०९ या वर्षाकरीता उपलब्ध करुन देण्यात आला होता. त्यानुसार सन २००९-२०१० या वर्षाकरीता सदर ग्रामपंचायतींना एकूण रुपये ३,१२,२९,०००/- (रुपये तीन कोटी बारा लाख एकोणतीस हजार फक्त) इतका निधी या आदेशान्वये उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

०२. पोलीस महासंचालकांनी जिल्हानिहाय ग्रामपंचायती व त्यांची लोकसंख्या विचारात घेवून उक्त तरतूदींचे जिल्हानिहाय वाटप तात्काळ करावे. पोलीस अधीक्षकांनी जिल्हयातील ४००० पर्यंत लोकसंख्या असलेल्या ग्रामपंचायतींना (रु.१०००/- फक्त) आणि ४००१ व त्यापेक्षा जास्त लोकसंख्या असलेल्या ग्रामपंचायतींना (रु.२०००/- फक्त) इतक्या तरतूदीचे तात्काळ वाटप करावे.

०३. महात्मा गांधी तंटामुक्त गाव मोहिमेअंतर्गत ग्रामपंचायतींना निधी उपलब्ध करुन देण्यासाठी होणारा खर्च रु.३,१२,२९,०००/- (रु. तीन कोटी बारा लाख एकोणतीस हजार फक्त) मागणी क्र.बी-१, प्रधान लेखाशीर्ष- २०५५-पोलीस, (००) १०९-जिल्हा पोलीस (००) (१०) तंटामुक्त गाव (२०५५-०५३ ३) ३१ सहायक अनुदाने, (योजनेत्तर/दत्तमत) या खालील मंजूर तरतुदीतून करण्यात यावा.

०४. उपरोक्त तरतूदीतून शासन निर्णय क्रमांक - तंमुगा १००८/सीआर-४३/२००८/पोल-१५, दिनांक १४/८/२००८ च्या शासन निर्णयान्वये विहित करण्यात आलेल्या नोंदवह्या, लेखन सामग्री व बैठकासाठी खर्च करता येईल. सदर खर्चाचा हिशेब ठेवणे व ग्रामसभेला अहवाल सादर करणे आणि संबंधित शासकीय यंत्रणांना याबाबत आवश्यक ती माहिती पुरविण्याची जबाबदारी ग्रामपंचायतीच्या ग्रामसेवकामार्फत तंटामुक्त गाव समितीची राहील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

( वि. म. जाधवर )
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
महालेखापाल-१, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
महालेखापाल- २,नागपूर, महाराष्ट्र राज्य,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
वित्त विभाग, व्यय-[illegible], अर्थ-३, अर्थ-१९, मंत्रालय, मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व परिक्षेत्राचे विशेष पोलीस महानिरीक्षक,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व जिल्हा पोलीस अधीक्षक,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
निवड नस्ती (पोल-१५).